**रेशीम शेती उद्योग व त्यावर आधारीत पुरक व्यवसाय व विविध योजनांचा प्रचार व प्रसिध्दीसाठीच्या माध्यम आराखडयाकरिता निधी वितरित व खर्च करण्यास मंजूरी देण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

### सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**शासन निर्णय क्रमांक: सपववि ४००१२/११/२०२५, DESKSERICULTURE CMTD**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ३१ मार्च, २०२५

**वाचा:-**

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. प्रावियो १०१८/प्र.क्र.१९/रेशीम कक्ष, दि.१८ एप्रिल,२०१८.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः मावज-२०२१/प्र.क्र.१२६/का-३४, दि.१३ ऑगस्ट, २०२१.

३) संचालक रेशीम यांचे पत्र क्र.रेशीम/कार्या-१०/प्रचार व प्रसिध्दी /आराखडा/२०२४-२५/९२४, दि.०१ ऑगस्ट, २०२४.

४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. संकिर्ण १०२४/प्र.क्र.८१/रेशीम कक्ष, दि.७ फेब्रुवारी, २०२५.

५) वित्त विभाग परिपत्रक अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/ अर्थबळ-३, दि.२५ जुलै, २०२४.

६) वित्त विभाग परिपत्रक अर्थसं-१०२४/ प्र.क्र.८०/ अर्थबळ-३, दि.१२ फेब्रुवारी, २०२५.

७) माहिती व जनसपर्क महासंचालनालय, याचे आदेश क्र.नवमाध्यम २०२५/रेशीम समाज डिजीटल/ का-/३२५, दि.२७.०२.२०२५.

८) वित्त विभाग परिपत्रक अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/ अर्थबळ-३, दि.१७ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :-**

राज्यातील शेतकऱ्यांना रेशीम उद्योगातून मिळणारे शाश्वत उत्पन्न व शासकीय योजनांची माहिती जनसामान्यपर्यत पोहचविण्यासाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने तयार केलेल्या माध्यम आराखड्यास व त्यानुसार जाहिरात प्रसिध्दीसाठी येणाऱ्या अंदाजित एकूण रक्कम ₹ ८७,६८,०००/- (सर्व करासहित) इतक्या खर्चास दि.०७.०२.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या संदर्भाधीन दि.२७.०२.२०२५ रोजीच्या आदेशानुसार मे.राईटस्पॉट ॲडव्हरटाईजमेंट एलएलपी, मुंबई यांना समाजमाध्यम व डिजीटल मिडीया प्लॅटफॉर्म यांच्या माध्यमातून देण्याबाबत कार्यारंभ आदेश देण्यात आला होता. त्याअनुषंगाने मे.राईटस्पॉट ॲडव्हरटाईजमेंट एलएलपी, मुंबई यांनी प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन संचालक (रेशीम) यांना सदर जाहिरात खर्चाची बिले सादर केली आहे. त्याअनुषंगाने रेशीम शेती विकास कार्यक्रमांतर्गत विविध योजना व त्यावर आधारीत पूरक

व्यवसायाच्या प्रचार व प्रसिध्दीच्या आराखडयाकरिता करण्यात येणाऱ्या खर्चासाठी ₹८७.६८ लक्ष इतका निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्याबाबत मान्यता देण्याची विनंती नियोजन व वित्त विभागास करण्यात आली असता वित्त विभागाने सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात सदर कार्यक्रमांतर्गत सुधारीत अर्थसंकल्पित तरतुदीच्या मर्यादेत प्रचलीत नियम व विहीत कार्यपध्दीचा अवंलब करण्याच्या अधीन राहून ₹८७.६८ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास मान्यता प्रदान केली आहे. सबब, रेशीम उद्योगाच्या प्रचार व प्रसिध्दी कार्यक्रमांतर्गत माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने तयार केलेल्या माध्यम आराखड्यानुसार देयकांचा खर्च भागविण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

रेशीम शेती विकास कार्यक्रमांतर्गत विविध योजना व त्यावर आधारीत पूरक व्यवसायाच्या प्रचार व प्रसिध्दीच्या माध्यम आराखडयानुसार करण्यात येणाऱ्या खर्चासाठी रेशीम उद्योगाचा प्रचार व प्रसिध्दी कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात ₹८७,६८,०००/- (सर्व करासहित) (अक्षरी रुपये सत्याऐंशी लक्ष अडुसष्ट हजार फक्त) इतका निधी संचालक (रेशीम) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत व खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर कार्यक्रमांतर्गत खर्च करताना माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांनी कार्यारंभ आदेशात नमूद केलेल्या अटी व शर्ती तसेच वेळोवेळी दिलेल्या सुचनांचे पालन करावे. तसेच, वृत्तपत्र, समाज माध्यम व डिजीटल माध्यमाद्वारे प्रसिध्द करण्यात आलेल्या जाहिरात प्रसिध्दीचा विविध प्लॅटफॉर्मचा अहवाल/ पुरावा तपासून खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर निधी खर्च करताना, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम, प्रचलीत अटी व शर्तीचे तसेच नियोजन व वित्त विभागाने वेळोवेळी घालून दिलेल्या सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्याच्या अटीच्या अधिन राहून मान्यता प्रदान करण्यात येत आहे. निधीचे विनियोग प्रमाणपत्र महालेखापाल व शासनास विहित मुदतीत सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. उक्त निधी कोषागारातून आहरण व संवितरण करण्यासाठी लेखाधिकारी, रेशीम संचालनालय, नागपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच, संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांना नियंत्रण अधिकारी (V०००३) म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. उक्त निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर संचालक (रेशीम) यांच्या अधिनस्त सुपूर्द करण्यात येत आहे.

५. सदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. सदर योजनेंतर्गत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

५ उक्त खर्च हा "मागणी क्र.व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ००, १०७, रेशीम उद्योग, (०१) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०१)(०१) राज्याचे वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ अंतर्गत रेशीम उद्योगाचा प्रचार व प्रसिद्धी (कार्यक्रम) (२८५१६५७४), २६, जाहिरात व प्रसिद्धी" अंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्रमांक २५६/२०२५/ व्यय-२, दि.२८.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३३१२००५०४१००२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ALKA VISHRAMRAO JAGTAP

Digitally signed by ALKA VISHRAMRAO JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=448f510bcadc7abd929408343ee74834ba4d3c8add456b66852582b6097ed093, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=32CC1545A1B50545BD5194D8C8A8B31532D9A97E1216092600CDFE0B5E29CEA1, cn=ALKA VISHRAMRAO JAGTAP
Date: 2025.03.31 20:06:20 +05'30'

**(अलका जगताप )**

**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १ व २, मुंबई/ नागपूर.
३) महालेखापाल, लेखापरिक्षा महाराष्ट्र २, नागपूर.
४) अ.मु.स. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) अ.मु.स (वित्त विभाग) (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव ( सा.प्र.वि), मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), मंत्रालय, मुंबई.
८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
९) संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर.
१०) उपसचिव (रेशीम) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) उपसचिव (अर्थसंकल्प -१७ स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१३) नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई.
१४) वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प-१३/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१५) सर्व प्रादेशिक रेशीम कार्यालये.
१६) सर्व जिल्हा रेशीम कार्यालये.
१७) अवर सचिव (का-१७ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) निवड नस्ती (रेशीम कक्ष).